वाशिष्ठी नदी चिपळुण जि. रत्नागिरी येथील गाळ व बेटे काढणे-टप्पा २ या कामास प्रशासकिय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०२३/ (प्र.क्र.८२/२०२३)/ सिं.व्य.(महसूल)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २१.०४.२०२३

वाचा : शासन निर्णय क्र. प्रशामा:२०२१/प्र.क्र.४८७/२०२१/सिं.व्य.(महसूल) मंत्रालय, मुंबई दि. ०७/०३/२०२२

प्रस्तावना :-

चिपळूण शहराच्या पुर्वेस अतितीव्र स्वरुपाचा पश्चिम घाट असून पश्चिम वाहीनी वाशिष्ठी नदीचा उगम पश्चिम घाटामध्ये होत असल्यामुळे वाशिष्ठी नदीच्या पाणलोट क्षेत्राचा उतारही तीव्र स्वरूपाचा आहे. दिनांक २२/७/२०२१ ते २३/७/२०२१ या कालावधीत वाशिष्ठी नदीच्या पाणलोट क्षेत्रात व घाटमाथ्यावर अनुक्रमे कोयना ६१० मि.मि., नवजा- ९४६ मि.मि., महाबळेश्वर ५५६ मि.मि. इतके पर्जन्यमान झाले असून दरम्यान चिपळूण तालुक्यात २०० मि.मि. पर्जन्यमानाची नोंद झाली आहे. वाशिष्ठी नदीचे पाणलोट क्षेत्र अतितीव्र उताराचे असल्यामुळे पाणलोट क्षेत्रातील पाणी जलद गतीने चिपळूण शहराच्या दिशेने खाली येते.

यातच कोयना धरणाचा कोळकेवाडी येथील विसर्ग पाणलोट क्षेत्रामध्ये होत असल्याने वाहून येणाऱ्या पाण्याच्या प्रवाहामध्ये वाढ होते. परिणामी पाणलोट क्षेत्रातून वाहून येणाऱ्या पाण्याच्या प्रवाहास नदी पात्रातील ठिकठिकाणी तयार झालेल्या गाळांच्या बेटांमुळे अवरोध निर्माण होऊन सदरचे पाणी चिपळूण शहरात शिरुन महापूराची परिस्थिती निर्माण झाली होती. सदर गाळ/गाळाची बेटे काढण्याचे काम टप्प्याटप्पाने करण्याचे नियोजिले असुन टप्पा-१ च्या कामास सन २०२१-२२ मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असुन त्याचे काम अंतिम टप्पात आहे. याच दृष्टीने पुढील टप्पा-२ चे काम हाती घेण्याकरीता क्षेत्रिय स्तरावरुन प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गत वाशिष्ठी नदी, चिपळुण जि. रत्नागिरी येथील गाळ व बेटे काढण्याच्या रु. **४८६००१८६** /- (चार कोटी शहाऐंशी लक्ष एकशे शहाऐंशी) एवढया खर्चाच्या संबंधित यांत्रिकी विभागाचे तांत्रिक मान्यताप्राप्त अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

क) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार गाळ काढण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

ख) कामास लागणाऱ्या आवश्यक त्या सर्व परवानग्या संबधित विभागाकडून सक्षम स्तरावरुन प्राप्त करुन घेण्यात याव्यात.
ग) सागरी किनारी नियमन क्षेत्र (CRZ) बाबत आवश्यक मंजूरी घेण्यात यावी.
घ) वाशिष्ठी नदीमधून काढलेला गाळ कोणत्याही नागरिकांना त्रास होणार नाही या दृष्टीने सुरक्षित ठिकाणी टाकण्यात यावा व गाळ पुन:श्च नदीमध्ये वाहून जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदर गाळ सुयोग्य ठिकाणी टाकण्यासाठी नगरपालिका/ जिल्हाधिकारी यांचेकडून जागा उपलब्ध करुन घ्यावी व त्या जागेची निश्चिती महसूल विभागाकडून करुन घेण्यात यावी.
च) नदीमध्ये खाजगी बेटे असल्यास संबधितांच्या आवश्यक त्या संमती / परवानग्या घेण्यात याव्यात.
छ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ज) लोकसहभागातून नदीतील गाळ काढून नेणे अथवा काढलेला गाळ वाहतूक करुन शेतात टाकणे यासाठी प्रयत्न करावे. त्याकरीता गौण खनिज शुल्क आकारणी करण्यात येऊ नये. या गौण खनिजाचा हिशोब देणे जलसंपदा विभागास बंधनकारक असणार नाही. सदर वाळू, दगड गोटे, वाळूमिश्रीत माती काढण्यासाठी स्वामित्व शुल्क माफ करणेसाठी समृध्दी महामार्गाप्रमाणे महसूल विभागाची परवानगी घ्यावी.

झ) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. जसेच सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत काम पूर्ण करण्याची व निधी खर्च करण्याची जबाबदारी संपुर्णपणे महामंडळाची राहील.

ट) जलसंपदा विभागाने प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकारी मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे भागभांडवली अंशदान (४७११ २८४७) " या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.१४/ सन २०२३ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२११४५०२५५२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2023.04.21 14:56:11 +05'30'

**( सो. आ. गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
८) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

९) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,

१४) मुख्यअभियंता, कोंकण प्रदेश, जलसंपदा विभाग, मुंबई

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.